मंत्रिमंडळ बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने केलेल्या “कार्यवाही” व “अंमलबजावणी” चा आढावा घेण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**मुख्य सचिव कार्यालय**
**शासन परिपत्रक क्र. मुसका-२०१७/ई-२५६३५४०/का.१,**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : २४ ऑक्टोबर, २०१८.

<u>वाचा</u> : १) शासन निर्णय, सा.प्र.विभाग/मुख्य सचिव कार्यालय, क्रमांक: मंमंप्र-२०१४/ई-११०१२/६/का.१, दिनांक २८ नोव्हेंबर, २०१४.
२) या कार्यालयाचे समक्रमांकाचे दिनांक २३ नोव्हेंबर, २०१७ चे शासन परिपत्रक.

**शासन परिपत्रक**

मंत्रिमंडळ प्रस्ताव सत्वर सादर करण्यासंदर्भात अंमलबविण्याची कार्यपध्दती व कालमर्यादेसंदर्भात संदर्भीय (१) येथील शासन निर्णयान्वये मंत्रालयीन सर्व विभागांना आवश्यक ते निदेश देण्यात आले आहेत. तसेच संदर्भीय (२) येथील शासन परिपत्रकान्वये मंत्रिमंडळ निर्णयासंदर्भातील अंमलबजावणीची माहिती विहित प्रपत्रात या कार्यालयास सादर करण्याच्या सूचना देण्यात आल्या आहेत.

२. मंत्रिमंडळ बैठकीत निर्णय झाल्यानंतर संदर्भीय (२) येथील शासन परिपत्रकासोबतच्या विहित प्रपत्रात संबंधीत निर्णयांच्या कार्यवाहीचा मासिक अंमलबजावणी आढावा सादर करण्याच्या सर्व मंत्रालयीन विभागांना सूचना देण्यात आल्या आहेत. परंतु मासिक अंमलबजावणी आढावा सादर करतेवेळी असे निदर्शनास आले की, मंत्रिमंडळ बैठकीत निर्णय झाल्यानंतर एका महिन्यात संबंधित विभागांकडून शासन निर्णय निर्गमित करण्याची कार्यवाही पूर्ण होते. परंतु सदर मंत्रिमंडळ निर्णयानुसार क्षेत्रिय स्तरावर एका महिन्यात उपरोक्त निर्णयांबाबत प्रत्यक्षात काय अंमलबावणी करण्यात आली याबाबतची माहिती प्राप्त होत नाही. त्यामुळे दिनांक २३.११.२०१७ च्या शासन परिपत्रकानुसार दर महिन्याला मंत्रिमंडळ बैठकीत सादर होणारा अंमलबजावणी आढावा विहित वेळेत सादर करणे शक्य होत नाही. ही वस्तुस्थिती लक्षात घेता खालीलप्रमाणे सुधारित निदेश देण्यात येत आहेत:-

**अ)** मंत्रिमंडळ बैठकीत दर महिन्याला सादर होणारा मासिक अंमलबजावणी आढावा संदर्भीय (१) येथील दिनांक २८.११.२०१४ च्या शासन निर्णयासोबतच्या विहित प्रपत्रानुसार सादर करण्यात यावा. म्हणजे मंत्रिमंडळ निर्णयानुसार विभागांनी शासन निर्णय विहित वेळेत निर्गमित केला अथवा नाही याबाबतची माहिती मंत्रिमंडळ बैठकीत विहित वेळेत सादर करता येईल.

**ब)** मागील ३ वर्षात मंत्रिमंडळाने जे निर्णय घेतले त्याची प्रत्यक्षात अंमलबजावणी झाली किंवा कसे याबाबत संदर्भीय (२) येथील दिनांक २३.११.२०१७ च्या शासन परिपत्रकासोबतच्या विहित प्रपत्रात अंमलबजावणी आढावा नियमितपणे मंत्रिमंडळ बैठकीत सादर करण्यात यावा.

३. वरीलप्रमाणे अ.क्र.(अ) येथील मंत्रिमंडळ बैठकीत दर महिन्याला सादर होणारा मासिक अंमलबजावणी आढावा **"ई-समिक्षा"** पोर्टलवर विहित प्रपत्रामध्ये संबंधित विभागांनी भरावा. याबाबतचा शासन निर्णयही "ई-समिक्षा" पोर्टलवर अपलोड करावा. अ.क्र. (ब) बाबतची माहिती दिनांक २३.११.२०१७ च्या शासन परिपत्रकात नमूद केल्यानुसार या कार्यालयाकडे न चुकता सादर होईल, याबाबत संबंधित विभागांचे सचिव यांनी कृपया दक्षता घ्यावी.

४. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संगणक संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक २०१८१०२४१३१७५७१७०७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dinesh Kumar Jain

Digitally signed by Dinesh Kumar Jain
DN: c=IN, o=All India Services, ou=CS Office Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ea3b8615acaf5a916338801298bc1b7123bd0cac17faf57848ccd7382e28252c, serialNumber=68589315014f4975fabfc7b90950c610d8b0535fa12b345b7e19fe84a006a889, cn=Dinesh Kumar Jain
Date: 2018.10.26 11:14:33 +05'30'

**( दिनेश कुमार जैन )**
**मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपालांचे सचिव,
२. मा.मुख्यमंत्र्यांचे अपर मुख्य सचिव / सचिव
३. सर्व मा.मंत्री / मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
४. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. निवड नस्ती (का.१).